उदगीर, जिल्हा लातूर येथील नवनिर्मित
दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) या
न्यायालयासाठी १ झेरॉक्स यंत्र खरेदी
करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

विधी व न्याय विभाग

शासन निर्णय क्रमांक : क्र.संकीर्ण २०१०/६५४/(११०)/का.१२,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक: २७ डिसेंबर, २०१०.

**वाचा** :-जिल्हा व सत्र न्यायालय, लातूर यांचे क्र. रोविले/६३०९/२०१०, दि.२९.११.२०१०चे पत्र.

**शासन निर्णय** :- उदगीर, जिल्हा लातूर येथील नवनिर्मित दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) या न्यायालयासाठी झेरॉक्स यंत्र शासनाच्या दरकरारावर असलेल्या शार्प बिझनेस सिस्टीम लि.कडून मॉडेल क्र. १७, A३/A३,RAM (MB):१६,bye pass:५० या मॉडेलचे रु.९१,२००/- + रु.४,५६०/- ५% टॅक्स सह एकूण रु.९५,७६०/- (रु.पंच्याण्णव हजार सातशे साठ फक्त) इतक्या रकमेस खरेदी करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, १०५-दिवाणी व सत्रे न्यायालये, १०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश, संकेतांक क्रमांक (२०१४ ०१७२) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो सन २०१०-११ या कालावधीत मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विसप्र १०००/प्र.क्र.४६/२००१ विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्ववयें वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक २६-अ, नियम ७६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अटीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

**( शिरीष संकपाळ )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

प्रबंधक, उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई (पत्राने),
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, लातूर,
दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर),उदगीर, जिल्हा लातूर
महालेखापाल-दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी,लातूर,
विधी व न्याय विभाग, का.७ का.२३ व २४,
निवडनस्ती.